**कृषी पंपाच्या विद्युतीकरणाचा प्रादेशिक असमतोल दूर करण्याकरीता महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना द्यावयाचे अर्थसहाय्य सन २०१५-२०१६ (योजनांतर्गत)**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र.निधीवि-२०१५/प्र.क्र.७०/ऊर्जा-३**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : १३ जुलै, २०१५**

**संदर्भ** : महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित मुंबई यांचे क्र.महाव्यवस्थापक (भा.ख.वि.)/१३९, दिनांक १३/०५/२०१५ चे पत्र.

**प्रस्तावना** :-

कृषी पंपाच्या विद्युतीकरणाचा प्रादेशिक असमतोल दूर करण्याकरीता महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना सहाय्यक अनुदान देण्याची तरतूद आहे. त्यासाठी सन २०१५-२०१६ या आर्थिक वर्षात रु.२२०,००,००,०००/- (रुपये दोनशे वीस कोटी फक्त) इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आलेली आहे. महावितरण कंपनीने संदर्भाधीन दि.१३/०५/२०१५ च्या पत्रान्वये केलेली मागणी विचारात घेऊन निधी उपलब्धतेनुसार रु.१५४,००,००,०००/- (रुपये एकशे चौपन्न कोटी फक्त) इतकी रक्कम महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना रु.१५४,००,००,०००/- (रुपये एकशे चौपन्न कोटी फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यास शासन मंजुरी देण्यात येत आहे.

२. या निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची रक्कम ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आलेली आहे त्याच कारणासाठी उपयोगात आणली जाईल याची खातरजमा करावी.

३. वरील बाबींचा खर्च "मागणी क्रमांक के-६, २८०१ वीज, ०५ पारेषण व वितरण, ८०० इतर खर्च, (००) राज्य योजनांतर्गत योजना, (००) (०६) कृषी पंप संचाच्या विद्युतीकरणाचा प्रादेशिक असमतोल दूर करण्यासाठी / ग्रामीण विद्युतीकरणासाठी महाराष्ट्र राज्य विद्युत कंपनी मर्यादित यासं सहाय्यक अनुदान (२८०१२६८९) ३१ सहाय्यक अनुदान" या लेखाशिर्षा खाली खर्ची टाकावा व तो सन २०१५-२०१६ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदी मधुन भागविण्यात यावा.

४. सदर रक्कम अधिदान व लेखा अधिकारी यांच्या मार्फत कोषागारातून काढून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री.वि.म.राजुरकर, अवर सचिव व नियंत्रण अधिकारी म्हणून श्री.ब.शे.मांडवे, उप सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२ यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यांनी महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांना मंजूर झालेली रक्कम रु.१५४,००,००,०००/- (रुपये एकशे चौपन्न कोटी फक्त) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांच्या नांवे स्वतंत्ररित्या धनादेश काढून वितररित करण्याची कार्यवाही करावी.

५. शासनाने महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित हया कंपनीमध्ये केलेली सदर भांडवली गुंतवणूक ही महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधारी कंपनी मर्यादित मार्फत केलेली भांडवली गुंतवणूक

समजण्यात यावी. महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित हया कंपनीने सदर रकमेच्या दर्शनी मूल्या इतके समभाग महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधारी कंपनी मर्यादित हया कंपनीच्या नांवे वितरीत करावेत.

६. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७/०४/२०१५ च्या परिपत्रकान्वये मंत्रालयीन विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात प्रधान सचिव (ऊर्जा) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१५०७१३१६५५५३७९१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vilas M Rajurkar

Digitally signed by Vilas M Rajurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vilas M Rajurkar
Date: 2015.07.13 16:57:42 +05'30'

**(वि.म.राजुरकर)**
शासनाचे अवर सचिव

**प्रत:-**

१) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधार कंपनी मर्यादित, हॉंगकॉंग बॅंक बिल्डिंग, फोर्ट, मुंबई.
२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, प्रकाशगड, वांद्रे, (पूर्व), मुंबई-५१
३) सचिव महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, वर्ल्ड ट्रेड सेंटर नं.१, १३ वा मजला, कफ परेड, कुलाबा, मुंबई-०५
४) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.
५) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
७) अधिदान व लेखा अधिकारी, अराप / रालेवि-१), मुंबई.
८) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
९) निवासी लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१.
१०) अवर सचिव (रोख), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.
११) विशेष कार्य अधिकारी (ऊर्जा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१२) क.अ.अधिकारी (प्रशा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.
१३) वित्त विभाग, (अर्थसंकल्प-१३ / साधनसंपत्ती / साऊ / व्यय-१६) मंत्रालय, मुंबई-३२.
१४) मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, सार्वजनिक बांधकाम प्रशासकीय इमारत, कर मार्ग रामकृष्ण चेंबूर, ३ रा मजला, चेंबुर, (पूर्व), मुंबई-४०००७१.
१५) निवडनस्ती (ऊर्जा-३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.